**सामान्य प्रशासन विभाग (खुद्द) साठी संगणक, प्रिंटर व स्कॅनर दुरुस्तीसाठी सेवासंविदेचा वार्षिक करार करणेबाबत**

# महाराष्ट्र शासन

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय, क्रमांकः दुरुस्ती-२०१९/प्र.क्र.७६/का.२४**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ३० जुलै , २०२०

**शासन निर्णय** :-

सामान्य प्रशासन विभाग (मा.तं) दिनांक ०१ ऑगस्ट २०११ च्या शासन निर्णयानुसार संगणक, प्रिंटर , लॅपटॉप, सर्व्हर व इतर सर्व आयटी उपकरणांचे वयोमान ५ वर्षे निश्चित करण्यात आलेले आहे. अशी उपकरणे कालबाहय झाल्यानंतर निर्लेखित करण्याबाबत सूचना आहेत. संगणक, प्रिंटर हयांची प्राथमिक अवस्थेमधील दुरुस्ती महाआयटी कडून करण्यात येते. संगणक सामुग्री महाआयटी तज्ञाकडून दुरुस्त होणे शक्य नसल्यास विभागातील कार्यासनांकडून असे संगणक कार्यासन २४ कडे निर्लेखनासाठी जमा करण्यात येतात.

२. संगणक व प्रिंटर मध्ये काही वेळा किरकोळ स्वरुपाची दुरुस्ती असते परंतु मंत्रालयात संगणक व प्रिंटरची दुरुस्ती करण्याची सोय उपलब्ध नसल्यामुळे चांगल्या स्थितीमधील संगणक व प्रिंटर निर्लेखित करावे लागतात. सदर बाब माहिती तंत्रज्ञान विभागाच्या निदर्शनास आणली असता संगणक व प्रिंटरची ५ वर्षे वारंटी कालावधी घेण्यात यावा. तसेच उपलब्ध असलेल्या संगणक व प्रिंटरसाठी सर्व्हिस करार करण्यात यावा असे अभिप्राय देण्यात आलेले आहेत.

३. विभागात यापूर्वी घेण्यात आलेल्या संगणक,प्रिंटर व स्कॅनर यांना अंदाजे सर्वसाधारण ३ वर्षे कालावधी झालेला आहे. तसेच सदर संगणक व प्रिंटर हे वारंवार नादुरुस्त होत असतात. GEM PORTAL संगणक व प्रिंटरसाठी सर्व्हिस कराराचे दर हे संगणक व प्रिंटरच्या संख्येनुसार असून ते जास्त असल्याचे दिसून आले आहे. **विभागात असलेल्या संगणक , प्रिंटर व स्कॅनरची ढोबळ माहिती घेण्यात आली असता संगणक २५६, प्रिंटर ७५ व स्कॅनर ३३ असल्याचे दिसून आले आहे**. **विभागात विविध कंपनीचे संगणक व प्रिंटर आहेत**. सदर संगणक सामुग्री सुस्थितीत ठेवण्यासाठी किमान दोन वर्षाचा सेवासंविदेचा करार करण्यासाठी **दिनांक २८ जानेवारी २०२० रोजी निविदा प्रसिध्द करण्यात आली होती** निविदा प्रक्रियेमध्ये ३ निविदाधारकांनी भाग घेतला होता. प्राप्त झालेल्या निविदेचे दरपत्रक खालीलप्रमाणे आहे.

| अ.क्र. | निविदा धारकाचे नाव | वस्तुचे नाव | भरण्यात आलेले दरपत्रक (१ नग वार्षिक) |
|---|---|---|---|
| १ | मे.बेस टॉप टेकनोलॉजी,मुंबई | संगणक | रु.५५०/- |
| | | प्रिंटर | रु.५५०/- |
| | | स्कॅनर | रु.५५०/- |
| २ | मे.माधव सेल्स कॉपरेशन,मुंबई | संगणक | रु.२४००/- |
| | | प्रिंटर | रु.२५००/- |
| | | स्कॅनर | रु.२५००/- |
| ३ | मे.नहुष टेकनोलॉजी,मुंबई | संगणक | रु.२५००/- |
| | | प्रिंटर | रु.३०००/- |
| | | स्कॅनर | रु.२५००/- |

४. मे.बेस टॉप टेकनोलॉजी,मुंबई यांचे दरपत्रक सर्वात कमी आहे. तसेच माहिती व जनसंपर्क विभागाने संबधित कंपनीशी सेवासंविदेचा करार केलेला आहे. मे.बेस टॉप टेकनोलॉजी,मुंबई या कंपनीशी **दिनांक २१ जुलै २०२० ते २० जुलै २०२१ या एक वर्षासाठी** प्रथमत: संगणक/प्रिंटर/स्कॅनरसाठी सेवा संविदेचा खालीलप्रमाणे वार्षिक करार करण्यात येत आहे. सेवासंविदेच्या करारासाठी येणा-या एकूण रुपये २,००,२००/- ( रुपये दोन लाख दोनशे फक्त ) एवढया खर्चास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | निविदा धारकाचे नाव | वस्तूचे नाव | भरण्यात आलेले दरपत्रक (१ नग वार्षिक) | सेवासंविदा करावयाच्या **वस्तूची संख्या** | एकूण रक्कम |
|---|---|---|---|---|---|
| १ | मे.बेस टॉप टेकनोलॉजी, मुंबई | संगणक | रु.५५०/- | २५६ | १,४०,८००/- |
| | | प्रिंटर | रु.५५०/- | ७५ | ४१,२५०/- |
| | | स्कॅनर | रु.५५०/- | ३३ | १८,१५०/- |
| | एकुण | | | | **२,००,२००/-** |

**निविदेच्या शर्ती/अटी खालीलप्रमाणे रहातील**.

१) संगणक/प्रिंटर/स्कॅनर याची किमान महिन्यातून एकदा सर्विसिंग करणे अनिवार्य राहील.

२) नादुरुस्त संगणक/प्रिंटर/स्कॅनर हयांची माहिती प्राप्त झाल्यानंतर एका तासात दुरुस्ती करणे बंधनकारक राहील.

३) संगणक/प्रिंटर/स्कॅनर हयाचे पार्ट नादुरुस्त झाल्यास ते दुरुस्त करणे शक्य नसल्यास नवीन पार्ट क.अ. ( का.२४) यांच्या मान्यतेने बदलण्यात यावेत व त्याची वारंटी देण्यात यावी. बदलण्यात येणा-या पार्टसाठी येणारा खर्च स्वतंत्रपणे मंजूर करण्यात येईल.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००७३०१४५५१००५०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VILAS RAMDAS THAKUR

Digitally signed by VILAS RAMDAS THAKUR
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=cb156fb408217396128e8dcaeed3f6fa70d9fd209eb9efc83bdd68b308614534, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=c8b1e52c5c4f922ab6eb7a0b44101c838aea34f29fbff0aebe9d85c3de3468c2, ou=GENERAL ADMINISTRATION DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=VILAS RAMDAS THAKUR
Date: 2020.07.30 15:25:41 +05'30'

( वि.रा. ठाकूर )

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई

२) मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई

३) मा. मंत्री / राज्यमंत्री, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई

४) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई

५) अपर मुख्य सचिव ( सेवा ) सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई

६) अपर मुख्य सचिव ( वित्त) वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई

७) अपर मुख्य सचिव ( नियोजन) नियोजन विभाग,मंत्रालय,मुंबई

८) प्रधान सचिव ( मा.तं),सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई
९) प्रधान सचिव ( उद्योग), उद्योग,उर्जा व कामगार विभाग,मंत्रालय,मुंबई
१०) विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई
११) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र -१, मुंबई /नागपूर
१२) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-१, मुंबई/नागपूर
१३) संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, मुंबई
१४) संचालक, माहिती व तंत्रज्ञान संचालनालय, मुंबई
१५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१६) अवर सचिव (रोखशाखा ) मंत्रालय,मुंबई
१७) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१८) मे.बेस टॉप टेकनोलॉजी,मुंबई
१९) निवड नस्ती (कार्यासन २४) सामान्य प्रशासन विभाग